**त्रिपक्षीय करारनामा करुन अवनत वनक्षेत्राचे पुनर्वनीकरण करण्यासाठी खाजगी व अशासकीय संस्थांचा सहभाग घेण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन आदेश क्रमांकः एफएलडी-२०१५/प्र.क्र.२९/फ-१०**
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दिनांक : २८/०५/२०१५

**प्रस्तावना -**

शासन निर्णय दिनांक २३/९/२०११ अन्वये अवनत वन क्षेत्राचे पुनर्वनीकरण करण्यासाठी खाजगी व अशासकीय संस्थांचा सहभाग घेण्याबाबत त्रिपक्षीय करारनामा करुन वनीकरण हाती घेण्याच्या धोरणास शासनाने मान्यता दिली आहे. शासन निर्णय, दिनांक ०७/०३/२०१५ नुसार पुनर्गठीत केलेल्या उच्चाधिकार समितीपुढे मे.सॅमसोनाईट साऊथ एशिया प्रा.लि., नाशिक यांनी सादर केलेला ५० हेक्टर अवनत क्षेत्रावर वनीकरण करण्याचा प्रस्ताव प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी सादर केला होता. या प्रस्तावाबाबत उच्चाधिकार समितीच्या दिनांक १६/०४/२०१५ रोजी झालेल्या बैठकीमध्ये चर्चा झाली. समितीने सर्व मुद्यांचा विचार करुन मे.सॅमसोनाईट साऊथ एशिया प्रा.लि., नाशिक मार्फत ५० हेक्टर अवनत क्षेत्रावर वृक्ष लागवड करण्याच्या प्रस्तावास मे.टैनवाला फाऊंडेशन, नाशिक या अशासकीय संस्थेस कामाचा अनुभव असलेली कमीत कमी ३ वर्षांची अट शिथिल करुन व आर्थिक सक्षमतेबाबत ऑडीट सर्टीफिकेट तसेच रोपवनाचे फोटोग्राफस सादर करण्याचे अटीवर विशेष बाब म्हणून मान्यता देण्याची शिफारस केली आहे.

**शासन आदेश-**

उच्चाधिकार समितीने केलेल्या शिफारशीचा साकल्याने विचार करुन, शासन आता असे आदेश देत आहे की, मे.सॅमसोनाईट साऊथ एशिया प्रा.लि., नाशिक यांनी सादर केलेल्या प्रस्तावास अनुसरुन प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी दिनांक १०/१२/२०१४ च्या पत्रान्वये सादर केलेल्या प्रस्तावानुसार खाली नमूद केलेल्या अवनत वनक्षेत्र असलेल्या ठिकाणी मे.सॅमसोनाईट साऊथ एशिया प्रा.लि., नाशिक ही औद्योगिक संस्था, वानिकी क्षेत्रात केलेल्या कामाचा अनुभव असलेली मे.टैनवाला फाऊंडेशन, नाशिक ही अशासकीय संस्था व वन विभाग यांच्यामध्ये त्रिपक्षीय करार करुन एकूण ५० हेक्टर क्षेत्रावर वृक्ष लागवड करण्याचा प्रकल्प राबविण्यास शासनाची मान्यता देण्यात येत आहे-

| गाव | सर्व्हे क्रमांक | वैधानिक दर्जा | क्षेत्र (हेक्टर) |
|---|---|---|---|
| मौ.खंबाळे, ता.इगतपुरी, जि.नाशिक | ३२६ | राखीव वन | ५० |
| | | एकूण | ५० |

सदर प्रकल्पास दिलेली मान्यता खालील अटींच्या अधीन राहून देण्यात येत आहे.

१) वरील क्षेत्रात वृक्ष लागवड करणे, जलमृदसंधारण करणे, ७ वर्षापर्यंत त्यांचे संरक्षण व संवर्धन करण्याचे काम मे.सॅमसोनाईट साऊथ एशिया प्रा.लि., नाशिक यांचे अर्थसहाय्याने मे.टैनवाला फाऊंडेशन, नाशिक यांनी करावे.

२) या प्रकल्पासाठी व त्याच्या व्यवस्थापनासाठी येणारा सर्व खर्च मे.सॅमसोनाईट साऊथ एशिया प्रा.लि., नाशिक करेल.

३) मे.टैनवाला फाऊंडेशन, नाशिक या अशासकीय संस्थेने आर्थिक सक्षमतेबाबत ऑडीट सर्टीफिकेट व रोपवनाचे फोटोग्राफस सादर करावेत.

४) या प्रकल्पांतर्गत करण्यात येणारी वृक्ष लागवड ही वन विभागाच्या अधिकाऱ्यांच्या पर्यवेक्षणाखाली करण्यात यावी. करारनाम्यानंतर २ वर्षांच्या आत वृक्ष लागवड पूर्ण करण्यात यावी.

५) या प्रकल्पासाठी शासन पत्र क्र.एफएलडी-१०१२/प्र.क्र.२०३/फ-१०, दिनांक ८/१/२०१३ अन्वये विहित केलेल्या त्रिपक्षीय करारनाम्याच्या मसुद्याप्रमाणे मे.सॅमसोनाईट साऊथ एशिया प्रा.लि., नाशिक ही औद्योगिक संस्था, मे. टैनवाला फाऊंडेशन, नाशिक ही अशासकीय संस्था व वन विभाग या तिघांमध्ये त्रिपक्षीय करारनामा करण्यात यावा. यासाठी वन विभागाच्यावतीने त्रिपक्षीय करारनाम्यावर स्वाक्षरी करण्यासाठी उप वनसंरक्षक, पश्चिम भाग नाशिक यांना प्राधिकृत करण्यात येत आहे.

६) प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर हे किंवा त्यांनी प्राधिकृत केलेले वन विभागाचे कोणतेही अधिकारी यांना प्रकल्प स्थळी भेट देवून प्रकल्पाचे निरीक्षण करण्याचा व त्याबाबत सुधारणा / सूचना करण्याचा अधिकार राहिल.

७) त्रिपक्षीय करारनाम्यातील कोणत्याही अटीचे मे.सॅमसोनाईट साऊथ एशिया प्रा.लि., नाशिक ही औद्योगिक संस्था, मे.टैनवाला फाऊंडेशन, नाशिक यांच्याकडून भंग झाल्यास त्रिपक्षीय करारनामा तात्काळ समाप्त करण्याचा अथवा इतर कोणतीही दंडात्मक कार्यवाही करण्याचा अधिकार प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांना असेल.

८) वरील ठिकाणी वृक्ष लागवड करताना, ती केल्यानंतरच्या ७ वर्षाच्या कालावधीत आणि भविष्यात कधीही या वनक्षेत्रावर मे.सॅमसोनाईट साऊथ एशिया प्रा.लि., नाशिक ही औद्योगिक संस्था व मे.टैनवाला फाऊंडेशन, नाशिक ही अशासकीय संस्था यांना कोणताही कायदेशीर व मालकी हक्क प्राप्त होणार नाही आणि त्याबद्दल त्यांना कोणत्याही न्यायालयात वा प्राधिकरणापुढे कोणताही दावा दाखल करता येणार नाही.

९) प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांना आवश्यक वाटतील अशा इतर अटी.

सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१५०५२८१७१६५६९३१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Chandrashekhar D Tarange

Digitally signed by Chandrashekhar D Tarange
DN: CN = Chandrashekhar D Tarange, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Revenue & Forest
Date: 2015.05.28 17:24:18 +05'30'

**(चं.द.तरंगे)**
**शासनाचे कार्यासन अधिकारी**

**प्रत,**

१. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन बल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर
२. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक तथा केंद्रस्थ अधिकारी, महाराष्ट्र राज्य, नागपूर
३. मुख्य वनसंरक्षक (प्रा.), नाशिक
४. उप वनसंरक्षक, पश्चिम भाग नाशिक
५. मे.सॅमसोनाईट साऊथ एशिया प्रा.लि., गट क्र.१५९-१६३, मु.पो.गोंदे (दुमाला), ता.इगतपुरी, जि.नाशिक
६. मे.टैनवाला फाऊंडेशन, गट नंबर ४१६ व ४१८, पो.पाडळी, तालुका इगतपुरी, जि.नाशिक
७. निवडनस्ती (फ-१० कार्यासन)